दुसऱ्या चित्रांत भक्ष्याचा पक्करस जेथें होतो, असें जें आंतडें तें दाखविलें आहे. अ, अ, उचललेलें काळीज होय. ब पित्ताशय होय. क पक्काशय होय. पक्काशयांतून आंतड्यांत भक्ष्य जाण्याच्या द्वाराचें स्थान ड होय. धाकट्या आंतड्यांपैकीं पहिलें आंतडें ड ए ह हीं अक्षरें दाखवितात. ह्या पहिल्या आंतड्यांत काळजांतून पित्त ज्या मार्गानें येतें, त्या मार्गाचा शेवट फ दाखवितो. तसें पांक्रियास् ह्यांतून एक प्रकारचा रस ज्या मार्गानें ह्या आंतड्यांत येतो, तो मार्ग ग फ हीं अक्षरें दाखवितात. ह्या चित्रांत पांक्रियास् हा अवयव दिसत नाहीं. कारण तो उदराचे मागल्या बाजूस पक्काशय व कणा ह्यांच्यामध्यें आहे. बाकीच्या आंतड्यांचीं वेटोळीं ह के ह्या अक्षरांनीं दाखविलीं आहेत.

## आकृति बाविसावी ( पृष्ठ १७३. )




येथें पहिल्या नक्ष्यांत एक स्नायु दाखविली आहे. अ आणि ब हीं स्नायूचीं शेवटें आहेत. अ हें शेवट हाडाच्या एका अचळ बिंदूशीं सांधलें आहे. ह्या अ शेवटास स्नाय्वारंभ म्हणतात. ब हें शेवट स्नायूंच्या आकुंचनानें हलणाऱ्या एका भागास बसविलें आहे. ह्या ब शेवटास स्नायुसंधि म्हणतात. क हें स्नायूचें उदर होय. हा भाग तंतुमय आहे. ह्या तंतूंस आकुंचन शक्ति आहे; तेणेंकरून शरिराचें अनेक प्रकारचें चलनवलन सिद्ध होतें.

ह्या दुसऱ्या नक्ष्यांत त्याच स्नायूचा एक तुकडा दाखविला आहे; व ह्या नक्ष्यावरून स्नायुघटक तंतु कोणीकडून कोणीकडे गेले आहेत, हें ही समजतें. अ आणि ब हीं शेवटें स्नायूच्या निरनिराळ्या बाजूस चिक-

ठेविलेलीं आहेत; आणि तंतु त्यांच्या मधून आडवे गेले आहेत. असें असल्यानें माण्यांस आपले अवयव अनेक प्रकारें व जलद हलवितां येतात.

## आकृति तेविसावी ( पृष्ठ १८२. )




प्रकाशाचें वक्रीभवन— ए पाहणाऱ्याचा डोळा होय. फ पाण्यांतील माशाचें स्थान होय. फ ब ए हे प्रकाश किरण होत. हे माशापासून पाहणाऱ्याच्या डोळ्यांत आले आहेत. हे पाण्याचा पृष्ठभाग ब एथें वांकडे झाले आहेत. फ हें माशाचें दृश्यमान स्थान होय, अ फ पाण्याची वास्तविक खोली होय व अ फ पाण्याची दृश्यमान खोली होय.

## आकृति चोविसावी ( पृष्ठ १८४. )




सूर्य किरणाचें पृथक्करण. प हें एक तिकोनी भरीव बिल्लोर आहे. अ ब एक खिडकी आहे, तिला एक भोंक आहे; त्यांतून स सूर्य किरण आंत येत आहे. हा सूर्य किरण बिल्लोरांतून बाहेर पडला म्हणजे त्याचें पृथक्करण होऊन निरनिराळ्या रंगांचे सात किरण होतात. तो फुटलेला किरण क ए फ ह्या अक्षरांनीं दाखविला आहे, ब निळा किरण दाखवितो. ह्या किरणाचें वक्रीभवन सर्वांत फार होतें, र तांबडा किरण दाखवितो. हा सर्वांत कमी वांकडा होतो.

ऋतुचक्र. **स** दक्षिण ध्रुव होय; **न** उत्तर ध्रुव होय. ए क्र, भूमध्य रेषा होय. वसंतऋतूंत दिवसरात्र सारखीं होतात त्या वेळीं पृथ्वी क्रांति वृत्तांत ज्या ठिकाणीं असते, तें ठिकाण **अ** दाखवितो. उन्हाळ्याचा मध्य होण्याच्या सुमारास पृथ्वी ज्या ठिकाणीं असते, तें ठिकाण **ब** दाखवितो. शरदृतूच्या सुमारास रात्रंदिवस पुनः सारखीं होतात, त्या वेळीं पृथ्वी ज्या ठिकाणीं असते तें ठिकाण **क** दाखवितो; व हिवाळ्याचा मध्य होतो, त्या सुमारास पृथ्वी ज्या ठिकाणीं असतें, ते ठिकाण **ड** दाखवितो.

**आकृति सव्विसावी** ( पृष्ठ १८६.



चांद्रमासांत चंद्र पृथ्वी भोंवतीं प्रदक्षिणा करीत असतां, त्याच्या कळा वाढत व कमी होत जातात, त्याची उपपत्ति— स सूर्य होय. पृ पृथ्वी होय. चंद्राच्या कक्षेंत म्हणजे गमनमार्गांत समांतर आठ बिंदु कल्पून अमावास्येपासून वद्य द्वादशीपर्यंत क्रमानें ह्या बिंदूंत आलेला चंद्र **अ ब क ड फ ग ह के** ह्या अक्षरांनीं दाखविला आहे. तसेंच त्या त्या बिंदूंत असतांना तो पृथ्वीवरून वृद्ध किंवा क्षीण दिसतो, हें **अ ब क ड फ ग ह के** ह्या अक्षरांनीं दाखविलें आहे.

## आकृति सत्ताविसावी ( पृष्ठ १९२. )




ह्या स्थळीं जहाजावरील होक्याच्या दोन आकृति दाखविल्या आहेत. पहिली आकृति केवळ गंजिफेची आहे, मध्य बिंदूंतून जाऊन परिघास दोन्हींकडे लागणाऱ्या रेषांनीं त्या गंजिफेचे आठ समभाग केले आहेत; व ह्या खेरीज सर्व परिघाचे ३६० समभाग करितात; व ह्या प्रत्येक भागास अंश म्हणतात. गंजिफेवर मुख्य जे चार बिंदु आहेत ते वरपासून क्रमानें उत्तर, पूर्व, दक्षिण, आणि पश्चिम, अशा चार मुख्य दिशा दाखवितात. तसेंच त्यांच्या मध्यें मध्यें दुसरे जे चार बिंदु आहेत, ते यथाक्रम आग्नेय, नैर्ऋत्य, वायव्य, व ईशान्य, अशा चार उपदिशा दाखवितात. गंजिफेच्या खालच्या बाजूस दक्षिणोत्तर रेषेखालीं लोखंडाची एक सळई बसविली असते; व त्या सळईस लोहचुंबकाची भावना दिली असते; त्यामुळें दक्षिणोत्तर राहण्याचा गुण तिच्या आंगीं अ

असतो; तेणेंकरून होक्यानें एक दिशा समजली म्हणजे, बाकीच्या सर्व दिशा समजतात. ह्या सळईच्या मध्यभागीं लहान खळी असते. व गंजिफेच्या मध्यभागीं एक बारीक पोलादी टोंक असतें; त्या टोंकावरती सळई बसवितात; तेणेंकरून ती सळई व तिला चिकटलेली गंजीफ ह्या त्या टोंकावर अलगत फिरतात. ही गंजीफ एका पितळेच्या वाटोळ्या डब्यांत घालून कडीला टांगली असते. टांगलेली असल्यामुळें गलबत वर खाल डोलले तरी होका क्षितिजाशीं समांतर राहतो.




दुसऱ्या आकृतींत होका पेटींत घालून दाखविला आहे; व आंतील रचना दृष्टीस पडावयासाठीं पेटीची एक बाजू दाखविली नाहीं. होका ज्या पात्रांत ठेविला असतो, त्याची कड **ग ह** हीं अक्षरें दाखवितात. त्या कडेवर दोन खांब **अ** आणि **ब** हे दाखविले आहेत. हे खांब **ग ह** कडेवर लंबरूप आहेत. **अ** हा खांब पितळेची रुंद पट्टी असते, व तिच्या मध्यें उभी चीर असते; तींतून पाहणारा पार पाहतो. **ब** खांब ही असाच असतो; व त्याच्या मधल्या चिरेंतून पलीकडला विवक्षित पदार्थ पाहतात. **ब** खांबास जी उभी चीर असते, तिच्या मधोमध अत्यंत बारीक तार किंवा घोड्याचा केंस बांधिला असतो. तसेंच त्या चिरेच्या मध्यबिंदूपासून एक रेषा खालीं जाऊन गंजिफेच्या कडेला लागली असते, तिच्या योगानें त्या कडेवरील अंश समजतात. विवक्षित पदार्थाकडे पाहतांना गंजीफ डळमळूं नये म्हणून ती स्थिर करण्याकरितां एक लहान

तरफ केली असते. होका ज्या पात्रांत असतो, त्या पात्राला एका अर्ध वर्तुळाकृति पितळेच्या पट्टीचा आधार असतो. ती पट्टी येथें **क ड** ह्या अक्षरांनीं दाखविली आहे. ही पट्टी मळसूत्रानें पेटीच्या बुडाशीं घट्ट बसविली असते. तसेंच त्या पात्राच्या दोन्ही बाजूंस बारीक कुसें असून तीं कुसें एका वाटोळ्या पितळी कडींत बसवितात. ती वाटोळी कडी एथें **ए फ** ह्या अक्षरांनीं दाखविली आहे; व त्या कुसांपैकीं एक कुसूं **अ** ह्या अक्षरानें दाखविलें आहे व दुसरें कुसूं दृष्टीआड गेलें आहे. ह्या दोन कुसांच्या योगानें होका क्षितिजाशीं समांतर राहतो. आतां वाटोळी कडी वर सांगितलेल्या अर्ध वर्तुळाकृति पट्टीचीं दोन शेवटें जीं **ब** व **क** ह्या अक्षरांनीं दाखविलीं आहेत, त्यांस कुसें करून त्यांवर अडकाविली आहे. ह्याप्रमाणें कुसांचे दोन जोड असल्यानें गलबत उभें किंवा आडवें कसें डोलले तरी, होका क्षितिजाशीं सर्वदां समांतर राहतो.

**आकृति अठ्ठाविसावी** ( पृष्ठ १९८. )



अळी, कोश, व पतंग अशीं तीन रूपें कीटांस क्रमानें प्राप्त होतात; तीं एथें दाखविलीं आहेत.

ताज महाल. पृष्ठ २४७.

